**समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या मागण्या तसेच अनुषंगीक बाबीचे निराकरण त्वरीत होण्याच्या दृष्टीने समिती गठीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. सकाम-२०१९/प्र.क्र.४२९/सामासु**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनाकं : २२ जानेवारी, २०२०

प्रस्तावना-

महाराष्ट्र राज्यात सामाजिक न्याय विभागामार्फत एकूण ५४ मान्यताप्राप्त समाजकार्य महाविद्यालये असून त्यापैकी सद्य:स्थितीत १ बंद, ३ विनाअनुदानित व ५० अनुदानित महाविद्यालये कार्यरत आहेत.

सदर समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांकडून त्यांच्या विविध मागण्या, अडचणी तसेच इतर समस्या या विभागाकडे प्राप्त होत असतात.

तरी सदर मागण्या, अडचणी तसेच अनुषंगीक बाबीचे निराकरण त्वरीत होण्याच्या दृष्टीने आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सामाजिक न्याय विभागाच्या अधिनस्त समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या मागण्या तसेच अनुषंगीक बाबीचे निराकरण त्वरीत होण्याच्या दृष्टीने आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | उप सचिव (सामासु), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सह अध्यक्ष |
| ३ | उप सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) | सदस्य |
| ४ | अवर सचिव (सामासु), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य सचिव |
| ५ | उप आयुक्त, समाजकल्याण, नागपूर | सदस्य |
| ६ | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, पुणे | सदस्य |
| ७ | संचालक, सेवार्थ | सदस्य |
| ८ | डॉ. चंदनसिंग रोटले, अध्यक्ष महाराष्ट्र सोशल वर्क एज्युकेटर्स मॅनेजमेंट अॅड स्टाफ फोरम | सदस्य |
| ९ | अध्यक्ष, मास्वे | सदस्य |
| १० | प्रभारी प्राचार्य, निर्मला निकेतन | सदस्य |
| ११ | वरिष्ठ तांत्रिक व्यवस्थापक, महा आयटी महामंडळ | सदस्य |

२. **समितीची कार्ये-**

(अ) सामाजिक न्याय विभागाच्या अधिनस्त समाजकार्य विद्यालयाशी / कर्मचा-यांशी संबंधित मागण्या/ समस्या निवारणाच्या अनुषंगाने सल्ला देणे.

(ब) राज्य शासनाच्या सध्या अस्तित्वात असणा-या धोरणात बदल आवश्यक असल्यास त्याबाबत शिफारशी सुचविणे.

(क) सदर समितीने उच्च व तंत्रशिक्षण विभागाकडील महाविद्यालयांना लागू असलेले विविध कायदे/नियम/ शासन निर्णय/संहिता/परिपत्रके, युजीसीची मार्गदर्शक तत्वे, Standard operating procedure इत्यादींचा तुलनात्मक अभ्यास करुन या विभागातील समाजकार्य महाविद्यालयांना उपरोक्त कायदे, नियम, शासन निर्णय, संहिता/ Standard operating procedure, परिपत्रके customization सहीत लागु करण्यासंदर्भात शिफारस करणे व अहवालात त्या बाबींचा उल्लेख करणे.

(ड)तसेच अन्य राज्यातील समाजकार्य महाविद्यालये कोणत्या पध्दतीने चालतात त्याचासुध्दा अभ्यास करणे/जाणून घेणे व त्या बदलानुरुप यथोचित धोरण आखण्यासाठी कृती योजना तयार करणे

(इ) राज्य शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशांची योग्य प्रकारे अंमलबजावणी होत असल्याबद्दल सुनिश्चिती करणे

ई) सदर समितीने समाजकार्य महाविद्यालयाशी/कर्मचा-यांशी संबंधित समस्यांचा/अनुषंगीक बाबींचा अभ्यास करुन परिपूर्ण अहवाल शासनास तीन महिन्यात सादर करणे

उ) सदर समिती राज्य शासन विनिर्दिष्ट करील अशी समाजकार्य महाविद्यालयाशी संबंधात अन्य कर्तव्ये पार पाडील.

३. प्रस्तुत समितीचे अध्यक्ष सूचित करतील त्याठिकाणी समितीच्या बैठकीचे आयोजन करण्यात येईल.

४. सदर समितीच्या अहवालातील शिफारशी स्विकृत कराव्यात किंवा कसे हा निर्णय पुर्णत: शासनाचा राहील.

५. सदर समितीची आवश्यकतेनुसार महिन्यातून किमान एकदा बैठक घेण्यात यावी. सदर बैठकीकरिता अशासकीय सदस्यांना नियमानुसार अनुज्ञेय असलेले भत्ते लागू होतील. यासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष " २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, ८०० इतर खर्च, (०३) (०१) समाजकल्यायण संस्थांना अनुदान (२२२५ १५०३) ०१ सहाय्यक अनुदाने क्र. एन-३" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००१२७११३५१७१५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2020.01.27 11:37:28 +05'30'

**( सं. गि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. उप सचिव / अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई
३. उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
४. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
५. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
६. प्राचार्य, सर्व अनुदानित समाजकार्य महाविद्यालये

७. संचालक, सेवार्थ

८. डॉ. चंदनसिंग रोटले, अध्यक्ष महाराष्ट्र सोशल वर्क एज्युकेटर मॅनेजमेंट ॲड स्टाफ फोरेम

९. अध्यक्ष, मास्वे

१०. प्रभारी, प्राचार्य, निर्मला निकेतन समाजकार्य महाविद्यालय, मुंबई

११. वरिष्ठ तांत्रिक व्यवस्थापक, महा आयटी महामंडळ.